ॐ श्रीगणेशाय नमः । शक्ति आदि शक्तीस । विचारिती प्रश्न एक सुरस । जरी नव्हता देव ऋषींच्या चित्तास । काम कांहीं तैं उरला ।।१।। तरी ते कामासुराचा वध वांछित । हा काम तैं निष्काम कैसे असत । तें ऐकून आदिशक्ति सांगत । सांगते भेद दोन्ही मार्गींचा ।।२।। सकाम मार्ग निष्काम मार्ग । सांगतें ऐका भेद ज्ञानग । संशयच्छेद होऊन

मु. पु. खंड. ६ अ. ३१-३२

मग । चित्त तुमचें शमेल ।।३।। स्वदेहपोषणासाठीं यशासाठीं । कामसंयुक्त भावयुक्त चित्तीं । देवांस जे नर भजती । ते सकाम जाणावे ।।४।। स्वस्वधर्म पालनार्थ करिती । देव सेवेस्तव कर्में जगती । ते देवांसी निष्काम भजती । परम भाव धरूनियां ।।५।। देवांनी जी केली भक्ति । ती नि:कामिकाच होती । ती कशी तें सांप्रती । प्रिय शक्तींनो ऐकावें ।।६।। त्या नि:काम भक्तीचें चिन्ह । हित कामनेनें सांगेन पावन । सृष्टिस्थितिलयार्थ विनतमन । ब्रह्मादिदेव कर्मपर ।।७।। ते गजाननासी म्हणती । आम्ही जीं कर्में करितों जगतीं । ती तुझी सेवा निश्चिती । क्रीडा तुझीच ती असे ।।८।। सर्वांच्या हृदयांत राहून । भोग भोगसी तूं दोषविहीन । म्हणोनि ती सेवा पावन । देहपोषिक तुझीच ।।९।। तुझ्या प्रीतिस्तव करित । आनंदें स्वधर्मकार्यें समस्त । सृष्टि आदि क्रिया तव तोषार्थ । म्हणोनि करितों ही प्रार्थना ।।१०।। दैत्यमुख्यानें त्या सांप्रत । सेवा तुझी केली खंडित । ती सेवा करण्या असमर्थ । उत्सुक असूनही आम्हीं सारे ।।११।। ऐसी प्रार्थना करित । देवसंघ विकट देवाप्रत । देहभोगादि भावांत । यशाची स्पृहा त्यांना होती ।।१२।। स्वधर्मसंयुत करिती । जे जे शरीरव्यापार जगतीं । ढुंढिप्रीत्यर्थ मानिती । तरी त्या क्रिया निष्काम ।।१३।। आतां देवींनो सांप्रत । ऐका विकटाचें विशेष चरित । जें ऐकतां भक्ति लाभत । श्रोत्यासी तैसी उद्गात्यासी ।।१४।। कुंभकर्णादी सर्व जाती । कामासुराप्रती भयभीत चित्तीं । महावीरास त्या निवेदिती । घडला सर्व वृत्तान्त ।।१५।। मयूरेश विकट नामें ख्यात । आला असे देवप्रार्थित । तो वधील महासुरांसी निश्चित । ऐसी आशंका वाटतसे ।।१६।। त्या विकटाचा दृष्टिनिपात । देवांसी तेजयुक्त करित । आम्हीं तेजविहीन समस्त । महामते हें आश्चर्य वाटे ।।१७।। आतां विकटासी जावें शरण । हेंचि शुभद आपणा शोभन । अन्यथा असुरसंघ

विनाश अशोभन । अटळ वाटे आम्हांसी ।।१८।। कुंभकर्णाचें ऐकून वचन । झाले असुर क्रोधमग्न । निर्भत्सना त्याची करून । सर्वांसमक्ष बोलती ।।१९।। ऐसा विकल होऊन । कां बोलसी भ्रांत वचन । कामासुराचा वेग सहन । करील ऐसा कोण असे ।।२०।। बळीचें वचन ऐकून । प्रतापी कामासुर बोले विषाद मन । आकाशवाणी सत्य होऊन । आला माझा शत्रु येथ ।।२१।। आता मारीन किंवा मरेन । त्याची चिंता न करी माझें मन । कामासुराचा निश्चय ऐकून । दुर्मद असुर बोले त्यासी ।।२२।। तेजस्वी वीर्ययुक्त वचन । कुंभकर्णे पाहिला विकट म्हणून । उत्पत्तिनाशयुक्त जाण । अन्यथा कैसे दर्शन झालें ।।२३।। जें जें होतसे दृष्ट । तें तें होतसे विनष्ट । ऐसें वेदवचन इष्ट । मनीं आण महामते ।।२४।। तेव्हां महाराजा कामासुरा तुजसी । कैसा मारील तुज वरयुक्तासी । चिंता सोडी राजेंद्रा तयासी । आम्ही मारु निःसंशय ।।२५।। शत्रूस वधून यासम विजयवंत । होऊं आम्हीं निश्चयें जगांत । आज्ञा द्यावी महादैत्यांप्रत । तुझ्या चरणाचे किंकर जे ।।२६।। पहा आमुचें महावीर्य रणांत । देवांचा नाश जें करील त्वरित । देवांनी माया केली अद्भुत । आकाशवाणी करविली ।।२७।। भयरूपिणी आकाशवाणी करून । दैत्य राक्षसा भिववून । देव साधू पाहती स्वइच्छित पूर्ण । विचार करी बुद्धिमंता ।।२८।। ही आकाशवाणी नसत । देहधारी कैसा मारील तुज जगांत । तूं महाबळी प्रतापवंत । चिंता कशाची आतां तुजला ।।२९।। दुर्मदाचें ऐकून वचन । बळी आदि महाक्रूर आनंदून । त्यास म्हणती तुझें भाषण । सर्वथैव सत्य असे ।।३०।। तदनंतर कामासुर । जमवून सर्व असुरवीर । चतुरंग बळें युक्त शूर । गजाननाशी लढण्या गेला ।।३१।। शुक्रानें नंतर दैत्येंद्रास । बोध केला अति सुरस । विविध गोष्टी तयांस । सांगे तेव्हां उपदेशपर ।।३२।।

परी मदोत्सिक्त बळगर्वें मोहित फार । न ऐके वचन जें सांगे शुक्र । मायामोहप्रभावें ।।३३।। मुनिमुख्य तो शुक्राचार्य जाणत । भावी काळवेग निश्चित । त्याचा निरोप घेऊन जात । परी कामासुर मानेना ।।३४।। दैत्य क्रोधयुक्त प्रहर्षित । युद्ध करण्या अति उत्कंठित । देवांचें मर्दन करण्या जात । जेथ ते पूर्वी राहिले होते ।।३५।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे षष्ठे खंडे विकटचरिते देवदैत्यसमागमो नाम द्वात्रिंशत्तमोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय बत्तिसांवा संपूर्ण)